स्वातंत्र्य सैनिक व त्यांचे नामनिर्देशित यांना शासकीय सेवेत वर्ग-३ व वर्ग-४मधील पदावर सेवाप्रवेशासाठी सवलत. स्वातंत्र्य सैनिकाने केलेले नामनिर्देशन बदलण्याचे अधिकार त्यांच्या विधवा वारस पत्नीस देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : सीएनएस-१०१०/१५०/प्र.क्र.६८/१०/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मे, २०१०.

वाचा : - १) शासन परिपत्रक क्रमांक:सीएनएस-१०८७/४९९/प्र.क्र.१२/१६-अ, दिनांक ०४.०३.१९९१
२) शासन निर्णय क्रमांक:सीएनएस-१००४/८०२/प्र.क्र.४२/०४/१६-अ, दिनांक ०६.०८.२००४
३) शासन परिपत्रक क्रमांक:न्याप्र-१००३/९९/प्र.क्र.२/०३/भाग-२/१६-अ,दिनांक २५.१०.२००५

**प्रस्तावना :-**

वरील संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रक दिनांक ०४.०३.१९९१ अन्वये स्वातंत्र्य सैनिकांना शासकीय सेवेत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदावर नियुक्तीसाठी विविध सवलती दिलेल्या आहेत. तद्नुसार वार्धक्य किंवा आजारपण इत्यादी कारणांमुळे स्वत: स्वातंत्र्य सैनिक अपात्र असतील तर ते जवळच्या नातेवाईकाचे नामनिर्देशन करू शकतील व अशी नामनिर्देशित व्यक्ती स्वातंत्र्य सैनिकासाठी असलेल्या सवलतींचा फायदा घेऊ शकते. जर स्वातंत्र्य सैनिक हुतात्मा झाला असेल किंवा नामनिर्देशन करण्यापूर्वी त्याचे निधन झाले असेल तर त्या प्रकरणी अपवाद म्हणून त्याच्या विधवा पत्नीस विहित केलेल्या व्याख्येतील जवळच्या अवलंबित नातेवाईकास नामनिर्देशन करण्याचा अधिकार देण्यात आला आहे. तसेच वरील संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय दिनांक ०६.०८.२००४ च्या अन्वये स्वातंत्र्य सैनिक व त्यांचे नामनिर्देशित यांना शासकीय सेवेतील भरतीबाबतच्या सवलतीसाठी, स्वातंत्र्य सैनिकाच्या नातवास किंवा नातीस (मुलाचा मुलगा किंवा मुलगी, मुलीचा मुलगा किंवा मुलगी) नामनिर्देशन करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

आता बरेच स्वातंत्र्य सैनिक हयात नाहीत. त्यामुळे त्यांनी यापूर्वी नामनिर्देशित केलेल्या उमेदवाराने शासकीय सेवेतील नोकरी विषयक सवलत घेतली नसेल तर अशा प्रकरणी स्वातंत्र्य सैनिकाने केलेले नामनिर्देशन बदलण्याचे अधिकार स्वातंत्र्य सैनिकाच्या विधवा वारस पत्नीस देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासन असे आदेश देत आहे की, स्वातंत्र्य सैनिकाने त्याच्या हयातीत ज्या उमेदवाराचे नामनिर्देशन केले आहे ते नामनिर्देशन त्याच्या मृत्यूनंतर **बदलण्याचे अधिकार** त्याच्या विधवा वारस पत्नीस खालील **अटींच्या अधिन राहून** देण्यात येत आहे-

१) ज्या उमेदवाराचे नामनिर्देशन यापूर्वी करण्यात आले आहे, त्याने शासन सेवेचा लाभ घेतलेला नसावा.

२) ज्या उमेदवाराचे नामनिर्देशन स्वातंत्र्य सैनिकाने त्याच्या हयातीत केले आहे त्या नामनिर्देशित व्यक्तीने नामनिर्देशन बदलण्यास संमतीपत्र देणे आवश्यक राहील.

अशाप्रकारे, नामनिर्देशन करण्याचा/बदलण्याचा अधिकार स्वातंत्र्य सैनिकाच्या विधवा वारस पत्नीस एकदाच देण्यात येत आहे.

२. पदभरती मा. सर्वोच्च न्यायालय व महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद यांनी दिलेल्या सूचना विचारात घेऊन निर्गमित केलेल्या संदर्भाधीन क्रमांक ३ येथे नमूद केलेल्या शासन परिपत्रक, दिनांक २५.१०.२००५ मधील मार्गदर्शक तत्वानुसारच करणे बंधनकारक आहे.

३. हा शासन निर्णय शासकीय/निमशासकीय सेवा, मंडळे/महामंडळे, नगरपालिका/महानगरपालिका, जिल्हापरिषदा, शासकीय अनुदानप्राप्त संस्था आणि ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार शासनाला आहे अशी इतर सर्व प्राधिकरणे, सेवा व संस्था यांना लागू राहील. तसेच हे आदेश या आदेशाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००४२०१४४९३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सु. ना. रणखांबे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
शासकीय अभियोक्ता, उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* सरकारी वकील, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* सरकारी वकील, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान सभा) विधानभवन, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान परिषद) विधानभवन, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
सर्व जिल्हा सेवायोजन अधिकारी, जिल्हा सेवायोजन केंद्र,
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १६-अ
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती/कार्यासन १६-अ
* (पत्राने)

D:\DANGARE\G R ROTA.lwp\58.